**कोविड -१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोविड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**कै.मारोती गणपतराव गवळे, सहाय्यक शिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सकआ-२०२२/प्र.क्र.१२२/आस्था-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : ३१.०३.२०२३

<u>वाचा</u> :- १) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि. २९.०५.२०२०
२) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि. १४.०५.२०२१
३) आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचा दि.२२.०४.२०२२ रोजीचा प्रस्ताव

**शासन निर्णय :**

वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९ मे, २०२० अन्वये कोविड - १९ संबंधित कर्तव्य बजावतांना कोविड - १९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू होणाऱ्या कर्मचाऱ्यांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य लागू करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी कै.मारोती गणपतराव गवळे, सहाय्यक शिक्षक यांच्या कुटुंबियांना वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि. २९.०५.२०२० व दि.१४.०५.२०२१ अनुसार रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

अनुसुचित जाती मुलांची शासकीय निवासी शाळा, मरशिवणी, ता. अहमदपूर, जि. लातुर येथे कार्यरत असलेले कै.मारोती गणपतराव गवळे, सहाय्यक शिक्षक यांचा कोविड - १९ संबंधित कर्तव्य पार पाडताना कोरोना विषाणू संसर्गाने दि. ३०.०४.२०२१ रोजी मृत्यू झाला आहे. त्यांच्या सेवा कोविड - १९ विषाणूच्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने मदतकार्य यामध्ये समाविष्ट होत आहेत. तसेच त्यांचा मृत्यृ कोविड - १९ मुळे झाला असल्याचे वैद्यकिय अधिकारी, जिल्हा सामान्य रुग्णालय उदगीर यांनी प्रमाणित केले आहे.

त्यानुसार अनुसुचित जाती मुलांची शासकीय निवासी शाळा, मरशिवणी, ता. अहमदपूर, जि. लातुर येथे कार्यरत असलेले कै.मारोती गणपतराव गवळे, सहाय्यक शिक्षक यांच्या कुटुंबियांना रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेचे सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास या आदेशाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि. २९.०५.२०२० व दि.१४.०५.२०२१ मधील तरतुदीनुसार कै.मारोती गणपतराव गवळे, सहाय्यक शिक्षक या कर्मचाऱ्याच्या वारसास या संदर्भातील तरतुदी व नियम विचारात घेऊन सानुग्रह सहाय्य अदा करण्याची जबाबदारी आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांची राहील.

प्रस्तुत खर्च मागणी क्रमांक एन - ३, मुख्य लेखाशिर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, २७७ शिक्षण (०१) वसतिगृहे (१०) शासकीय निवासी शाळा - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (१०) (१) - अनुसूचित जातींच्या मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय निवासी शाळा सुरु करणे (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम) (२२२५-डी-११७), १३-कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३३०१८०२५३८४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH M KHAIRMODE

Digitally signed by SATISH M KHAIRMODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=a6351a2e14339ed095cda2a544af43de4b681afa9a5b92d3ad62ec4726ebebab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=79208454FA5609FCBFBE8A59A44EC2402F387AA627CD8748B6D2CFDDF68B76C6, cn=SATISH M KHAIRMODE
Date: 2023.03.31 15:22:39 +05'30'

**( सतीश खैरमोडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. आयुक्त, समाज कल्याण, पुणे.
२. महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
३. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, लातूर.
४. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण विभाग, लातूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, लातुर.
६. मुख्याध्यापक, अनुसुचित जाती व नवबौध्द मुलांची शासकीय निवासी शाळा, मरशिवणी, ता.अहमदपूर, जि.लातूर.
७. कै.मारोती गणपतराव गवळे यांचे वारसदार यांना, मार्फत सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण विभाग, लातूर
८. आस्था-२ निवडनस्ती.